जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण
लातूर यांना निधी वितरीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र -२०१९/प्र.क्र.७९/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- २७.०२.२०२०.

**संदर्भ:-** समक्रमाचे शासन निर्णय दि. १.४.२०१९.

**प्रस्तावना:-**

जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास संदर्भाधिन शासन निर्णयान्वये प्रत्येकी ३० लक्ष प्रमाणे विभागीय आयुक्ताच्या मार्फत ३६ जिल्हयांना निधी वितरीत करण्यात आला होता. जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण लातूर यांना वितरीत करण्यात आलेला निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले असून अतिरिक्त १२ लक्ष निधीची मागणी प्रस्तावित केली आहे. हा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, लातूर रू. १२ लक्ष वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरीत करण्याबाबतची कार्यवाही विभागीय आयुक्त औरंगाबाद यांनी करावी.

जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, लातूर यांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे विनियोग जगजागृती / क्षमताबांधणी / आराखडे / प्रशिक्षण व कार्यशाळा संस्थात्मक मजबुतीकरण / शोध व बचाव साहित्य खरेदी / संरचनात्मक कामे यासाठी करण्यात यावा.

सदर जिल्हा आपत्ती सौम्यीकरणासाठी वितरीत करण्यात आलेला निधी अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना कोषागारातून काढून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

जिल्हयांना प्राप्त तरतूदीतून खर्च करून झालेल्या खर्चास मासिक खर्च अहवाल दरमहा १० तारखेपर्यंत वित्तीय सल्लागार व सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे पाठवावा. खर्च करताना केंद्र शासनाचे ज्ञापन दिनांक ३० जुलै २०१५ चे उल्लंघन करू नये. सदर ज्ञापन www.ndmindia.nic.in वर उपलब्ध आहे.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०- सर्वसाधारण ००१, संचालन व प्रशासन (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (०१) (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे. (२२४५-१७६१) ३१, सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२००३०२१५३०२०९११९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9a2bc3b45be4b89f7c46c4474cf90b8a3c477e34c06449 4b04238ca50ee43db6, postalCode=400032, street=1ST FLOOR MAIN ROAD, MANTRALAYA, ou=REVENUE AND FOREST DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SHRIRANG SHRIPATI GHOLAP
Date: 2020.03.02 15:34:19 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, नागपूर

२) जिल्हाधिकारी, लातूर.

३) महालेखाकार (महाराष्ट्र-१) मुंबई.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

६) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवड नस्ती/ आव्यप्र-१.